**पशुसंवर्धन विभाग, जिल्हा परिषद यांच्यामार्फत जिल्हा नियोजन मंडळ, राज्यस्तरीय योजना, केंद्र पुरस्कृत योजना व अन्य विभागाकडून, अन्य स्त्रोतातून प्राप्त होणाऱ्या निधीमधून राबविण्यात येणाऱ्या योजनांना तांत्रिक मंजूरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०१८ / प्र.क्र. ३१(भाग-१) /पदुम-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०१ जून, २०२३.

<u>वाचा :</u> १) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१८ / प्र.क्र. ३१ (भाग-१) /पदुम-४, दि.०१.११.२०२१.
२) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-२२ (२३)/ तां-१/सी.आर-०९/ २०२४/२०२२ , पुणे, दि. २४.०९.२०२२.
३) आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र. एफवायपी-२२ (२३)/ तां-१/सी.आर-०९/ ३६७/२०२२,पसं-६, पुणे, दि.१७.०२.२०२३.

**<u>प्रस्तावना -</u>**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय दि.०१.११.२०२१ अन्वये पशुसंवर्धन विभाग, जिल्हा परिषद यांच्यामार्फत जिल्हा नियोजन मंडळ, राज्यस्तरीय योजना, केंद्र पुरस्कृत योजना व अन्य विभागाकडून प्राप्त होणाऱ्या निधीमधून राबविण्यात येणाऱ्या योजनांना तांत्रिक मंजूरी प्रदान करण्याबाबतचे अधिकार संबंधित जिल्हयाचे जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, संबंधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पुणे आणि आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांना विहित करण्यात आलेले असुन, रु.५०,००,०००/- व त्यावरील रकमेच्या योजनांना तांत्रिक मंजुरी प्रदान करण्याचे अधिकार अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पुणे आणि आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांना प्रदान केले असल्यामुळे रु.५०,००,०००/- लाख व त्यापेक्षा जास्त रकमेचे प्रस्ताव तांत्रिक मंजुरीसाठी वरिष्ठ कार्यालयास सादर करावे लागतात व यासाठी निश्चितच काही कालावधी लागत असल्यामुळे योजनेच्या अंमलबजावणीस विलंब होतो.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता पशुसंवर्धन विभाग, जिल्हा परिषद यांच्यामार्फत जिल्हा नियोजन मंडळ, राज्यस्तरीय योजना, केंद्र पुरस्कृत योजना व अन्य विभागाकडून, अन्य स्त्रोतातून प्राप्त होणाऱ्या निधीमधून राबविण्यात येणाऱ्या योजनांना तांत्रिक मंजुरी प्रदान करण्यासाठी रु.३.०० कोटी पर्यंतचे अधिकार संबंधित प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन यांना प्रदान करण्याच्या अनुषंगाने या विभागाचा शासन निर्णय दि.०१.११.२०२१ अधिक्रमित करून पुढील प्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

जिल्हा नियोजन मंडळ, राज्यस्तरीय योजना, केंद्र पुरस्कृत योजना व शासनाच्या अन्य विभागाकडून, अन्य स्त्रोतातून निधी प्राप्त होत असलेल्या योजनांना तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार आयुक्त पशुसंवर्धन, पुणे व त्यांच्या अधिनस्त विविध प्राधिकारी यांना पुढीलप्रमाणे नमुद वित्तीय मर्यादेच्या अधिन राहून प्रदान करण्यास याव्दारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **अधिकाराचे स्वरुप** | **अधिकार प्रदान करण्यात आलेले अधिकारी / प्राधिकरण** | **अंदाजित खर्च (रुपयात)** | |
|---|---|---|---|---|
| | | | **न्युनतम मर्यादा** | **अधिकतम मर्यादा** |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | जिल्हा नियोजन मंडळ, राज्यस्तरीय योजना, केंद्र पुरस्कृत योजना व शासनाच्या अन्य विभागाकडून, अन्य स्त्रोतातून निधी प्राप्त होत असलेल्या योजनांना तांत्रिक मंजुरी देण्याचे अधिकार | १. संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त | ० | २५,००,०००/- |
| | | २. संबंधित प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त | २५,००,००१/- | ३,००,००,०००/- |
| | | ३. आयुक्त पशुसंवर्धन, पुणे | ३,००,००,००१/- | संपूर्ण अधिकार |

जिल्हा वार्षिक योजनांतर्गत राबविण्यात येत असलेल्या नियमित योजनांव्यतिरिक्त अन्य अपवादात्मक / विशेष बाबी संदर्भात आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

योजनेच्या निकषाप्रमाणे प्रस्तावाची तपासणी करुन तांत्रिक मंजुरी देण्याची संपुर्ण जबाबदारी तांत्रिक मंजुरी देणाऱ्या संबंधित प्राधिकारी यांची राहील.

हा शासन निर्णय ग्रामविकास, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच, वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.१८५/ २०२३ /व्यय-२, दि.१०.०५.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असुन त्याचा सांकेतांक २०२३०६०११६०५२४३१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2023.06.01 16:07:15 +05'30'

**( डॉ. संजय वि. डोईजोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
३. मा.मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
६. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन,
७. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.
८. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपुर.

९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त,
१०. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,
११. वित्त विभाग (कार्यासन व्यय-२) मंत्रालय, मुंबई
१२. नियोजन विभाग (कार्यासन- १४३१ ) मंत्रालय, मुंबई
१३. ग्राम विकास विभाग (वित्त-९),बांधकाम भवन, मर्झबाण रोड, मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१५. निवडनस्ती पदुम-४.